**बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) या केंद्र पुरस्कृत अभियानांतर्गत "बीज प्रक्रिया केंद्र" व "बियाणे साठवणुक गोदामांची उभारणी" करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १८ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :-१) केंद्र शासनाने बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) अंतर्गत ग्रामपंचायत पातळीवर FPO/SHG/CIG/सहकारी संस्थामार्फत ५०० मेट्रीक टन क्षमतेचे बीज प्रक्रिया केंद्र व बियाणे साठवणुक गोदामांची उभारणी करण्याबाबत दिनांक २२.०१.२०१८ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना

२) कृषि आयुक्तालयाच्या दिनांक २२.०२.२०१८ रोजीच्या पत्राने दिलेल्या मार्गदर्शक सूचना.

३)कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१८/प्र.क्र.१११/१-अे, दि.०३.०८.२०१८

४) शासन पत्र क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे, दि.१०.०३.२०२१

५) शासन पत्र क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे, दि.१०.०३.२०२१

६) शासन पत्र क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे, दि.१९.०३.२०२१

७) केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-४/२०२०-SD.VI, दि.१९.०७.२०२१.

८) कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.गुनि१/२/बियाणे/एसपीपी/२४८५७/२०२१,दि.०३.०८२०२१

९) केंद्र शासनाचे पत्र क्र.१०-४/२०२०-SD.VI, दि.१३.०८.२०२१.

१०) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे, दि.०५.१०.२०२१

११) शासन पत्र क्रमांक: संकीर्ण २७१९/प्र.क्र.१४२/१-अे, दि.१४.०२.२०२२

१२) कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र.गुनि१/२/बियाणे/एसपीपी/६०२२/२०२२, दि.१६.०२.२०२२

**प्रस्तावना :-**

कृषि क्षेत्रामध्ये विविध पिकांचे उत्पादन व उत्पादकता वाढीसाठी शेतकऱ्यांना स्थानिक पातळीवर उच्च प्रतीचे गुणवत्तापूर्ण व जास्त उत्पादन देणाऱ्या जातींचे प्रमाणित /सत्यप्रत बियाणे उपलब्ध करून देण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न करणे गरजेचे आहे. यासाठी गांव पातळीवर शेतकऱ्यांना विविध पिकांचे बीजोत्पादन घेण्यासाठी आवश्यक सुविधा उपलब्ध करून देण्याची नितांत आवश्यकता आहे. केंद्र शासन स्तरावरील बियाणे क्षेत्रातील सुधारणा विषयीच्या सचिव कार्यगटाच्या शिफारसीनुसार केंद्र शासनाने दिनांक १३ ऑक्टोबर, २०१७ रोजीच्या पत्रान्वये बियाणे व लागवड साहित्य उप-अभियानांतर्गत (SMSP) ग्रामपंचायत पातळीवर शेतकरी उत्पादक कंपनी (FPO) / स्वयंसहाय्यता गट (SHG) / अन्नधान्य उत्पादक संघ (CIG) / सहकारी संस्था/ राज्य शासनाची मान्यता असलेली व कृषि क्षेत्राशी संबंधीत असलेल्या उपक्रमामध्ये कार्यरत असलेल्या संस्थांमार्फत ५०० मेट्रीक टन क्षमतेचे बीज प्रक्रिया केंद्र व बियाणे

साठवणुक गोदामांची उभारणी करण्याबाबत कळविलेले आहे. सदर योजना १००% केंद्र पुरस्कृत असून यामध्ये महाराष्ट्र राज्यासाठी ५० युनिटचे लक्षांक देण्यात आलेले आहेत.

सदर योजनेअंतर्गत ग्रामपंचायत स्तरावर बियाणे प्रक्रिया व साठवणुक केंद्र उभारणीसाठी रक्कम रू. ६० लाख किंवा प्रत्यक्ष उभारणीस येणारा खर्च यापैकी जे कमी असेल तितके अर्थसहाय्य देय आहे. केंद्र शासनाकडून दिनांक २२ जानेवारी, २०१८ रोजीच्या पत्रान्वये सदर योजना राबविण्यासाठी प्राप्त झालेल्या मार्गदर्शक सूचना आणि कृषि आयुक्तालयाने त्यांच्या स्तरावर तयार केलेल्या मार्गदर्शक सूचना / निकष यांच्या आधारे सदर योजना राज्यात राबविण्याकरिता वाचा क्र. ०३ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाने सन २०२१-२२ मध्ये १० युनिट उभारणीसाठी रु.६.०० कोटी इतका निधी वाचा क्र. ०७ वरील पत्रान्वये पुनर्जिवित करुन उपलब्ध करुन दिलेला होता. त्यास अनुसरुन राज्य शासनाकडून बियाणे प्रक्रिया व साठवण केंद्र या योजनेसाठी कृषि आयुक्तालयाकडून शिफारसप्राप्त प्रस्तावांपैकी शासनाच्या अनुक्रमे वाचा क्र. ०५ व ०६ वरील दि.१०.०३.२०२१ व दि. १९.०३.२०२१ रोजीच्या पत्रांन्वये एकूण १० प्रस्तावांना मान्यता देण्यात आलेली होती व रू.६.०० कोटी निधी वाचा क्र. १० वरील शासन निर्णयान्वये सदर १० प्रकल्पांकरिता वितरीत करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने सन २०२१-२२ मध्ये सदर योजनेकरिता रु.९.०० कोटी इतका निधी वाचा क्र. ०९ वरील पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे. त्यास अनुसरून कृषि आयुक्तालयाकडून शिफारसप्राप्त प्रस्तावांपैकी एकूण ०९ प्रस्तावांना शासनाच्या वाचा क्र. ११ वरील दि.१४.०२.२०२२ रोजीच्या पत्रांन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पांच्या उभारणीकरिता रू.५.४० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती वाचा क्र. १२ वरील पत्रान्वये कृषि आयुक्तालयाने केलेली आहे. सदर योजनेसाठी चालू आर्थिक वर्षात केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ ३९९५) अंतर्गत सन २०२१-२२ करीता रु. २० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद केलेली असून सदर तरतूदीमधून या योजनेसाठी रु.६.०० कोटी इतका निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्यात आलेला आहे. तरी, सदर लेखाशिर्षांतर्गत एकूण रू.१४.०० कोटी इतकी तरतूद उपलब्ध आहे. वित्त विभागाने निधी वितरणाकरिता उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ५० टक्के इतकी मर्यादा विहीत केलेली असल्याने रू.४.०० कोटी इतकी तरतूद लेखाशिर्ष क्र. २४०१ ३९९५ अंतर्गत सदर योजेकरिता वितरणासाठी उपलब्ध आहे.

बियाणे व लागवड साहित्य उप-अभियानांतर्गत (SMSP) ग्रामपंचायत पातळीवर शेतकरी उत्पादक कंपनी (FPO) / स्वयंसहाय्यता गट (SHG) / अन्नधान्य उत्पादक संघ (CIG) / सहकारी संस्था/ राज्य शासनाची मान्यता असलेली व कृषि क्षेत्राशी संबंधीत असलेल्या उपक्रमामध्ये कार्यरत असलेल्या संस्थांमार्फत ५०० मेट्रीक टन क्षमतेचे ०९ बीज प्रक्रिया केंद्र व बियाणे साठवणुक गोदामांची उभारणी करण्यासाठी (१००% केंद्र पुरस्कृत) रू.४.०० कोटी इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २४०१ ३९९५ अंतर्गत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

बियाणे व लागवड साहित्य उप-अभियानांतर्गत (SMSP) ग्रामपंचायत पातळीवर शेतकरी उत्पादक कंपनी (FPO) / स्वयंसहाय्यता गट (SHG) / अन्नधान्य उत्पादक संघ (CIG) / सहकारी संस्था/

राज्य शासनाची मान्यता असलेली व कृषि क्षेत्राशी संबंधीत असलेल्या उपक्रमामध्ये कार्यरत असलेल्या संस्थांमार्फत ५०० मेट्रीक टन क्षमतेचे ०९ बीज प्रक्रिया केंद्र व बियाणे साठवणुक गोदामांची उभारणी करण्यासाठी (१००% केंद्र पुरस्कृत) रू.४.०० कोटी इतका निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २४०१ ३९९५ अंतर्गत वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र व राज्य शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

३. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रकियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

५. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत. तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं -२०२१/ प्र.क्र.४८/ अर्थ ३, दिनांक ०६.०४.२०२१, दिनांक २४.०६.२०२१, दिनांक.१४.१०.२०२१ व दिनांक ०३.०२.२०२२ मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२१८१५०६२४८५०१ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2022.02.18 15:08:06 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा, यांचे खाजगी सचिव महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
७. संचालक (नि. व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर .
९. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
११.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी.
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३.सह सचिव (नि. व गु.नि.), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५.कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.अवर सचिव, (व्यय-१) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती (कार्यासन १-अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.